केंद्रीय रेशीम मंडळ पुरस्कृत तुती व टसर रेशीम लागवड कार्यक्रम -(अकारावी पंचवार्षिक योजना)

आर्थिक सहाय्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

शासन निर्णय क्र.रेशीम-१००७/प्र.क्र.१९०/रेशीम कक्ष

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- १३ सप्टेंबर, २०१०

वाचा:- १) केंद्रीय रेशीम मंडळ , बंगलोर यांचे पत्र क्र.३७/११वी योजना/२००७-०८/टीएस, दि.१.५.२००८

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे पत्र क्र.रेशीम-१०७७/प्र.क्र.१९०/रेशीम कक्ष, दि.१५.२.२००८ .

३) संचालक, रेशीम, नागपूर यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-९/केपुयो/१०-११/२३५४, दि.१७.०३.२०१०.

**शासन निर्णय:-**

राज्यात केंद्रीय रेशीम मंडळाच्या आर्थिक सहाय्याने संदर्भ क्र.(१) येथील दि.१.५.२००८ च्या पत्राच्या अनुषंगाने तुती व टसर लागवडीकरिता विविध योजना राबविण्यात येत आहेत. या कार्यक्रमांतर्गत रेशीम संचालनालयामार्फत तुती व टसर लागवडीकरिता शेतकऱ्यांना आर्थिक सहाय्य मंजूर करण्यात येते. अकराव्या पंचवार्षिक योजनेत केंद्रीय रेशीम मंडळाने तुती लागवडीसाठी पुणे, उस्मानाबाद, बीड, बुलढाणा या ४ जिल्हयांची व टसर योजनेसाठी भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर या ४ जिल्हयांची सदर कार्यक्रम राबविण्यासाठी निवड केली आहे. या योजनेंतर्गत केंद्रीय रेशीम मंडळाचे संदर्भ क्र.(१) येथील दिनांक १.५.२००८ च्या पत्रान्वये केंद्रीय सहभाग, राज्य सहभाग व लाभार्थ्यांचा सहभाग निश्चित केलेला आहे. त्यास अनुसरुन **अकराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीकरिता (सन २००७-१२)** सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे तुती लागवडीसाठी पुणे, उस्मानाबाद, बीड, बुलढाणा या ४ जिल्हयांची व टसर योजनेसाठी भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर या ४ जिल्हयांतील शेतकऱ्यांना विविध योजना राबविण्यास तसेच त्याकरिता केंद्रीय रेशीम मंडळाचा, राज्य शासनाचा व लाभार्थी शेतकऱ्यांचा आर्थिक सहभाग मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी लाभार्थीची निवड करण्याकरिता खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समन्वय समितीमार्फत करण्यात यावी:-

१) केंद्रीय रेशीम मंडळाचे अधिकारी.

२) रेशीम संचालनालयाचे प्रतिनिधी.

३) शेतकऱ्यांचे प्रतिनिधी.

३. लाभार्थी शेतकऱ्याने किमान दोन ते तीन पीक दुबार जातीचे (BV) बेणे घेणे आवश्यक असून लाभार्थ्याकडून सात-बाराचे उतारे, ८-अ चा नमुना घेण्यात यावा. तसेच लाभार्थ्याकडून सात वर्षापर्यंत तुती लागवड करण्याबाबतचा करारनामा करुन घेण्यात यावा.

४. सदर योजनेचे राज्यस्तरीय आढावा खालील समितीमार्फत घेण्यात यावा:-

१) संचालक, रेशीम .... अध्यक्ष

केंद्रीय रेशीम मंडळ पुरस्कृत तुती व टसर रेशीम लागवड कार्यक्रम -(अकारावी पंचवार्षिक योजना)

आर्थिक सहाय्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

शासन निर्णय क्र.रेशीम-१००७/प्र.क्र.१९०/रेशीम कक्ष

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- १३ सप्टेंबर, २०१०

वाचा:- १) केंद्रीय रेशीम मंडळ , बंगलोर यांचे पत्र क्र.३७/११वी योजना/२००७-०८/टीएस, दि.१.५.२००८

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे पत्र क्र.रेशीम-१०७७/प्र.क्र.१९०/रेशीम कक्ष, दि.१५.२.२००८ .

३) संचालक, रेशीम, नागपूर यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-९/केपुयो/१०-११/२३५४, दि.१७.०३.२०१०.

**शासन निर्णय:-**

राज्यात केंद्रीय रेशीम मंडळाच्या आर्थिक सहाय्याने संदर्भ क्र.(१) येथील दि.१.५.२००८ च्या पत्राच्या अनुषंगाने तुती व टसर लागवडीकरिता विविध योजना राबविण्यात येत आहेत. या कार्यक्रमांतर्गत रेशीम संचालनालयामार्फत तुती व टसर लागवडीकरिता शेतकऱ्यांना आर्थिक सहाय्य मंजूर करण्यात येते. अकराव्या पंचवार्षिक योजनेत केंद्रीय रेशीम मंडळाने तुती लागवडीसाठी पुणे, उस्मानाबाद, बीड, बुलढाणा या ४ जिल्हयांची व टसर योजनेसाठी भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर या ४ जिल्हयांची सदर कार्यक्रम राबविण्यासाठी निवड केली आहे. या योजनेंतर्गत केंद्रीय रेशीम मंडळाचे संदर्भ क्र.(१) येथील दिनांक १.५.२००८ च्या पत्रान्वये केंद्रीय सहभाग, राज्य सहभाग व लाभार्थ्यांचा सहभाग निश्चित केलेला आहे. त्यास अनुसरुन **अकराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीकरिता (सन २००७-१२)** सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे तुती लागवडीसाठी पुणे, उस्मानाबाद, बीड, बुलढाणा या ४ जिल्हयांची व टसर योजनेसाठी भंडारा, गोंदिया, गडचिरोली, चंद्रपूर या ४ जिल्हयांतील शेतकऱ्यांना विविध योजना राबविण्यास तसेच त्याकरिता केंद्रीय रेशीम मंडळाचा, राज्य शासनाचा व लाभार्थी शेतकऱ्यांचा आर्थिक सहभाग मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी लाभार्थीची निवड करण्याकरिता खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समन्वय समितीमार्फत करण्यात यावी:-

१) केंद्रीय रेशीम मंडळाचे अधिकारी.

२) रेशीम संचालनालयाचे प्रतिनिधी.

३) शेतकऱ्यांचे प्रतिनिधी.

३. लाभार्थी शेतकऱ्याने किमान दोन ते तीन पीक दुबार जातीचे (BV) बेणे घेणे आवश्यक असून लाभार्थ्याकडून सात-बाराचे उतारे, ८-अ चा नमुना घेण्यात यावा. तसेच लाभार्थ्याकडून सात वर्षापर्यंत तुती लागवड करण्याबाबतचा करारनामा करुन घेण्यात यावा.

४. सदर योजनेचे राज्यस्तरीय आढावा खालील समितीमार्फत घेण्यात यावा:-

१) संचालक, रेशीम .... अध्यक्ष